**महाराष्ट्र शासन**

क्र.मग्रारो२०१९/प्र.क्र.२९/रोहयो ६अ
नियोजन विभाग ,नविन प्रशासन भवन,
१६ वा मजला, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक- ३ फेब्रुवारी, २०२०

## अधिसूचना

केंद्र शासनाने राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना कायद्याच्या कलम २७ (१) अंतर्गत राज्यातील प्रत्येक जिल्ह्याच्या ठिकाणी तक्रार निवारण प्राधिकारी (लोक प्राधिकरणाविरुध्दच्या तक्रारीची तपासणी करण्यासाठी नियुक्त केलेला अधिकारी ) नियुक्त करण्याचा निर्णय क्र. जे.११०११/२१/२००८-नरेगा, दि. ७ सप्टेंबर, २००९, च्या आदेशान्वये घेतलेला आहे. सदर आदेशातील बाबी अधिक सुस्पष्ट होण्यासाठी केंद्र शासनाने १४/०१/२०१४ रोजीच्या आदेशान्वये त्यामध्ये सुधारणा केलेल्या आहेत. सदर आदेशान्वये तक्रार निवारण प्राधिकारी यांची नेमणूक करण्यासाठी मा. अप्पर मुख्य सचिव,नियोजन विभाग यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती स्थापन केली आहे.

२. राज्यातील ७ जिल्ह्यांत तक्रार निवारण प्राधिकाऱ्याच्या रिक्त असलेल्या पदांसाठी संबंधीत जिल्ह्यातील स्थानिक वृत्तपत्रात जाहिरात देऊन पात्र व इच्छुक उमेदवारांकडून अर्ज मागविण्यात आले आहेत. सदर अर्ज संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडे प्राप्त झालेले आहेत. जिल्हाधिकारी यांनी त्या अर्जांची छाननी करुन मुलाखतीसाठी पात्र उमेदवारांच्या यादीसह मूळ अर्ज शासनास सादर केलेले आहेत.

३. तक्रार निवारण प्राधिकारी निवड समितीने दि.१० जानेवारी, २०२० रोजी बैठक घेऊन सदर अर्जाची पुन्हा छाननी करुन उमेदवारांच्या मुलाखती घेतल्या आहेत. उमेदवारांचा रोहयो अंमलबजावणीतील अनुभव, विधी, शिक्षण तसेच सामाजिक क्षेत्रातील अनुभव विचारात घेऊन ७ पैकी ६ जिल्ह्यांकरिता प्रत्येकी एक किंवा दोन प्रमाणे एकूण ९ तक्रार निवारण प्राधिकारी यांची शिफारस केली आहे. जिल्हा व शिफारस केलेल्या तक्रार निवारण प्राधिकारी यांची नावे पुढीलप्रमाणे आहेत:-

| अ.क्र. | जिल्ह्याचे नाव | उमेदवाराचे नाव |
|---|---|---|
| १ | बीड | १)श्री .कुंडलिक विठ्ठलराव गवते<br>२)श्री.किरण लिंबाजीराव सानप |
| २ | गडचिरोली | १)डॉ.दिलीप केशवराव बारसागडे |
| ३ | परभणी | १)श्री. विजय माणिकराव कुपटेकर<br>२)श्री. तुळशीराम पांडुरंग डावरे |
| ४ | वर्धा | १)श्री. अरविंद गुलाबराव सरदार<br>२)श्री.बबन विठोबाजी दांडेकर |
| ५ | गोंदिया | १)श्री. नारायणप्रसाद रामजी जमाईवार |
| ६ | नागपूर | १)श्री. श्रीराम यादव पांडे |

४. केंद्र शासनाने तक्रार निवारण प्राधिकारी यांच्या निवडीसंदर्भात पुढीलप्रमाणे प्रक्रिया पूर्ण करण्याचे निर्देश दिलेले आहेत.

I) तक्रार निवारण प्राधिकारी यांना नियुक्ती देण्यापूर्वी त्यांची नावे राज्य शासनाच्या कार्यालयीन वेबसाईटवर प्रसिध्द करावी व निवड केलेल्या उमेदवारांवाबत जनतेचे अभिप्राय व हरकती ३० दिवसांत मागविण्यात यावेत. ३० दिवसांची मुदत संपल्यानंतर समितीचे प्राप्त झालेले अभिप्राय व हरकती संदर्भात

तपासणी करुन निवड प्रसिद्ध केल्याच्या दिनांकापासून ३० दिवसांत योग्य उमेदवार निवडीचा निर्णय घ्यावा. निनावी अभिप्राय व हरकतींचा विचार केला जाऊ नये.

II) उमेदवाराची निवड करताना तो सर्वज्ञात, स्वच्छ प्रतिमा असलेला असावा आणि त्याला कमीत कमी १० वर्षांचा लोकप्रशासन, विधी, शैक्षणिक, समाजकार्य किंवा समाज व्यवस्थापनाचा अनुभव असावा.

III) उमेदवार हा कोणत्याही राजकीय पक्षाशी निगडीत नसावा किंवा सभासद नसावा.

IV) तक्रार निवारण प्राधिकारी पदासाठी निवड केलेला उमेदवार हा शाररिकदृष्ट्या सक्षम असावा तसेच जिल्ह्यात दौरे, तपासणी व ग्रामीण दुर्गम भागांना भेटी देण्यास योग्य असावा.

V) तक्रार निवारण प्राधिकारी पदासाठी उमेदवाराच्या प्रथम नियुक्तीचा कालावधी २ वर्षांचा असेल, त्यानंतर त्याचे काम समाधानकारक असल्यास त्यांना एक+एक असे दोन वर्षांसाठी मुदतवाढ देण्यात येईल किंवा त्यांच्या वयाची ६८ वर्ष पूर्ण होईपर्यंत किंवा जे अगोदर घडेल त्यावर नियुक्तीचा कालावधी अवलंबून असेल.

VI) निवड केलेल्या तक्रार निवारण प्राधिकारी यांची कामगिरी असमाधानकारक असल्यास निवड समितीच्या मान्यतेने त्यांची नियुक्ती राज्य शासनास रद्द करता येईल.

५. केंद्र शासनाच्या निर्देशानुसार निवड केलेल्या, वरील तक्रार निवारण प्राधिकारी यांची यादी राज्य शासनाच्या वेबसाईट वर प्रसिध्द करण्यात आली आहे. तक्रार निवारण प्राधिकारी म्हणून निवड केलेल्या वरील यादीतील उमेदवारांबाबत कोणाच्या काही सूचना/हरकती असल्यास त्या सूचना/हरकती ही अधिसूचना निर्गमित झाल्याच्या तारखेपासून ३० दिवसांच्या आत शासनाकडे लेखी स्वरुपात पाठवाव्यात. सदर निवड यादी प्रसिध्द केल्याच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत शासनाकडे किंवा संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडे कोणतीही सूचना/हरकती किंवा आक्षेप प्राप्त न झाल्यास या संबंधी कोणाची कोणतीही हरकत नाही असे समजण्यात येवून पुढील योग्य ती कार्यवाही करण्यात येईल.

६. सदर शासन अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संकेताक २०२००२०३१५२८४२७५१६ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Lata Dhananjay Varkhade

Digitally signed by Lata Dhananjay Varkhade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9ad1228058f8fb4cd326111df2ae4c34809e96ebf35800ed3f6117c015b69d73, serialNumber=fcc9f2a2fe32cc4babb66b21f021d2bacfce4c83fa8f39f6e6fa1eaf02606418, cn=Lata Dhananjay Varkhade
Date: 2020.02.03 15:30:02 +05'30'

(ल.ध. वरखाडे)

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रती,**

१) मा. मंत्री (रोहयो) यांचे खाजगी सचिव

२) अप्पर मुख्य सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहायक

३) सचिव (रोहयो) यांचे स्वीय सहायक

४) उप सचिव (रोहयो) यांचे स्वीय सहायक.